अनेक विंग असलेल्या एका इमारतीच्या विंगनिहाय
सहकारी गृहनिर्माण संस्था स्थापन करणेबाबत

---

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन परिपत्रक क्र. सगृयो-२००१/प्र.क्र.२३४/१४-स
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३० जुलै, २००४.

**परिपत्रक :-**

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, ब-याच वेळा एकाच इमारतीमध्ये दोन किंवा अधिक विंग असलेल्या प्रकरणात विंगनिहाय अनेक गृहनिर्माण संस्था नोंदविण्याचे प्रस्ताव शासनाकडे प्राप्त होतात. त्यापैकी काही इमारतींची प्रथम सहकारी गृहनिर्माण संस्था म्हणून नोंदणी झालेली असते व त्यांचे विभाजन करण्याचा प्रस्ताव असतो तर इतर बहुसंख्य प्रकरणी इमारतीचे नोंदणी करतेवेळी विंगनिहाय अनेक संस्थांमध्ये नोंदणी करावी असा प्रस्ताव असतो. शासनाच्या दिनांक १७/१/१९८५ च्या परिपत्राकानुसार एका इमारतीसाठी एक गृहनिर्माण संस्था ही सहकार आयुक्तांची शिफारस मान्य करण्यात आली आहे व त्यानुसार सर्व निबंधकांना कळविण्यात आलेले आहे. सदर परिपत्रकानुसार विंगनिहाय सहकारी गृहनिर्माण संस्थांची नोंदणी करता येत नाही. मात्र सभासदांकडून काही वेळा अशा संस्थांची मागणी करण्यात येते.

सदर वस्तुस्थिती लक्षात घेऊन सहकार आयुक्ताकडून प्राप्त झालेल्या अभिप्रायानुसार विंगनिहाय सहकारी गृहनिर्माण संस्था नोंदणीस खालील निकषानुसार परवानगी देता येईल.

१) प्रत्येक संस्थेस इमारतीमध्ये प्रवेश करण्यासाठी स्वतंत्र प्रवेश द्वार असावे.

२) प्रत्येक संस्थेस स्वतंत्र वीज मीटर असावे.

३) प्रत्येक संस्थेस स्वतंत्र पाण्याची टाकी व पाणी मिटर असावे.

४) प्रत्येक संस्थेने महापालिकेकडून टॅक्स असेसमेंट करुन घ्यावे.

५) बिल्डर, प्रमोटर यांनी इमारती बाधण्यापूर्वी सबंधित महापालिके-कडून वीज,पाणी या गोष्टी विभागून इमारतीचा आराखडा मंजूर केलेला असावा.

६) इमारतीच्या परिसरामध्ये काही बाबी सामायिक असल्यास उदा. कंम्पाऊंड वॉल, मुख्य प्रवेश द्वार, मोकळी जाग, स्विमिंग पूल इत्यादी असल्यास संस्थेच्या प्रवर्तकांनी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम २० अ अन्वये इतर विगंच्या संस्थांबरोबर भागीदारी करार करण्यासाठीचे ५० रुपयाच्या बॉंडवर हमीपत्र देण्यात यावे.

७) बिल्डर,प्रमोटर यांनी जमिनीचे हस्तांतरण विंगप्रमाणे होणा-या सर्व संस्थांनी धारण केलेल्या क्षेत्रफळाच्या प्रमाणात करुन देण्याबाबतचे हमीपत्र ५० रुपयांच्या बॉंडवर देण्यात यावे.

८) संस्थेचा नोंदणी प्रस्ताव "बिल्डरचे असहकार्य" या सदरात दाखल झाला असल्यास संस्थेच्या प्रवर्तकांनी जमिनीचे हस्तांतरण संस्थेने धारण केलेल्या क्षेत्रफळाच्या प्रमाणात करुन देण्याबाबतचे हमीपत्र ५० रुपयांच्या बॉंडवर देण्यात यावे.

विंगनिहाय सहकारी गृहनिर्माण संस्था नोंदणी करताना वर नमूद केल्याप्रमाणे निकष तपासून संस्था नोंदणी होणे का गरजेचे आहे याचा कारण मिमांसेसह प्रस्ताव शासनास पाठविण्याची कार्यवाही करण्यात यावी.

( चंद्रकांत सणगर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रत:

सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था,
सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
सर्व तालुका उप/सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था
निवड नस्ती.